“ताजबाग, जि.नागपूर विकास आराखडा”
सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता
निधी वितरणाबाबत...

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२२/प्र.क्र.४१/का.१४४३

मादाम कामा माग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० मार्च, २०२३

**वाचा :**

१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.ताविआ-२०१३/प्र.क्र.१६/का.१४४३, दिनांक ३० सप्टेंबर, २०१३
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०२२/प्र.क्र.४१/का.१४४३, दिनांक ०५.१२.२०२२

**प्रस्तावना :**

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांच्या ताजबाग येथील दर्ग्याच्या परिसराचा विकास करण्यासाठी नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.१३२.४९ कोटी इतक्या किंमतीच्या “ताजबाग, जि.नागपूर विकास आराखड्यास” प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या आराखड्याकरीता “मागणी क्र.ओ-१०, ५४५२-पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्र, (००)(००)(०२) ताजबाग विकास योजना-जि.नागपूर (कार्यक्रम) (५४५२ ००७१), ५३-मोठी बांधकामे” या लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता रु.१४,०८,००,०००/- (अक्षरी रुपये चौदा कोटी आठ लाख मात्र) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पित निधीपैकी रु.५,९१,३६,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी एक्याण्णव लाख छत्तीस हजार मात्र) इतका निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. अधिक्षक अभियंता, नागपूर महानगर प्रादेशिक विकास प्राधिकरण, नागपूर यांनी दिनांक २३.०२.२०२३ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने ताजबाग विकास आराखड्यासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता रु.७,००,००,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी मात्र) सुधारीत अंदाजापैकी उर्वरीत निधीमधून रु.१,०८,६४,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी आठ लाख चौसष्ठ हजार मात्र) इतका निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. ताजबाग, जि.नागपूर विकास आराखड्यांतर्गत कामांसाठी रु.१,०८,६४,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी आठ लाख चौसष्ठ हजार मात्र) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

३. ताजबाग, जि.नागपूर विकास आराखड्याकरीता होणारा सदरहु खर्च "मागणी क्र.ओ-१०, ५४५२-पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्र, (००)(००)(०२) ताजबाग विकास योजना-जि.नागपूर (कार्यक्रम) (५४५२ ००७१), ५३-मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, नागपूर यांचे कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. तसेच, वितरीत केलेल्या निधीचे "उपयोगिता प्रमाणपत्र" विभागीय आयुक्त, नागपूर यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६.०३.२०२३ मधील तरतूदी तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३२६/२०२३/व्यय, दिनांक २८.०३.२०२३ नुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०११५८४७०११६ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN BHANUDAS KHEDKAR

Digitally signed by NITIN BHANUDAS KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=99977b58556463dbb2db463cec9482d13f7661ed3b2a95e83e386485fff4c21e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CFCA827F49093860DB8AA4627DA10E31F82BD40A9631D2E01EC212A473A6BCA2, cn=NITIN BHANUDAS KHEDKAR
Date: 2023.03.30 12:03:22 +05'30'

**(नितीन खेडकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत : तातडीच्या कार्यवाहीसाठी,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
२) जिल्हाधिकारी, नागपूर

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन,) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.पालकमंत्री, नागपूर जिल्हा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
७) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर

१०) सभापती, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, प्रकल्प विभाग, दुसरा माळा, नागपूर सुधार प्रन्यास संकुल, वेस्ट हायकोर्ट रोड, गोकुळपेठ, नागपूर-४४० ०१०
११) आयुक्त, महानगरपालिका, नागपूर
१२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर
१३) कक्ष अधिकारी, का.व्यय-८/का.व्यय-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) जिल्हा नियोजन अधिकारी, नागपूर
१५) कक्ष अधिकारी, का.१४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवडनस्ती (का.१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.